राष्ट्रीय कुष्ठरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत औषधी व औषधीसाहित्य खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१८/प्र.क्र.२४७/आरोग्य-८**
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रूग्णालय कंपांउंड,
कॉम्प्लेक्स बिल्डिंग, १० मजला, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १२ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७
२) सहसंचालक, आरोग्य सेवा, (कुष्ठरोग व क्षयरोग) पुणे यांचे पत्र क्रमांक ससंआसे/ कुष्ठवक्षय/ कक्ष-औ.भां./राज्य.अनु./प्रशा.मान्यता/१७४८९-९२/१८, दिनांक २२.१०.२०१८.

**प्रस्तावना :-**

आरोग्य सेवा संचालनालयाच्या अखत्यारितील सहायक संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग) तसेच कुष्ठरुग्णालये, इत्यादी आरोग्य संस्थामध्ये दाखल होणाऱ्या कुष्ठरुग्णांसाठी आवश्यक असणारी पूरक औषधी व औषधीसाहित्य खरेदी करण्यासाठी राष्ट्रीय कुष्ठरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) पुणे यांनी संदर्भाधीन दिनांक २२.१०.२०१८ च्या पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. त्या अनुषंगाने राष्ट्रीय कुष्ठरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत औषधी व औषधीसाहित्य खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) पुणे, यांनी संदर्भाधीन दिनांक २२.१०.२०१८ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानूसार राष्ट्रीय कुष्ठरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत खालील तक्त्यात दर्शविलेली कुष्ठरुग्णांसाठी आवश्यक असणारी पूरक औषधी व

औषधीसाहित्य (एकूण अंदाजित किंमत रु. १५,९६,४७०/-) खरेदी करण्यासाठी खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | खरेदी करावयाच्या साहित्याचा तपशिल | प्रति नग किंमत (अंदाजित) | प्रस्तावित खरेदी | एकूण अपेक्षित खर्च |
|---|---|---|---|---|
| १ | Surgical Spirit B.P.५०० ml | रु.८८/- | १२५० | रु. १,१०,०००/- |
| २ | Miconazole Cream १५ gm | रु.६.९९ | १७५०० | रु. १,२२,३२५/- |
| ३ | Oint Fluconazole ०.५% w/v १५gm | रु.१४/- | ८८०० | रु. १,२३,२००/- |
| ४ | Betamethasone ointment १५ gm | रु.१०.२५ | ९७०० | रु. ९९,४२५/- |
| ५ | Glycerine ५०० ml. | रु.७०/- | १२०० | रु. ८४,०००/- |
| ६ | Ciprofloxacine Eye/Ear Drop ५ ml. | रु.५.७७ | ११००० | रु. ६३,४७०/- |
| ७ | Sodium Hypochlorite Solution ५ lt.Jar | रु.२६७/- | ६५० | रु. १,७३,५५०/- |
| ८ | Cap Thalidomide १०० mg. | रु.७५/- | १०९४० | रु. ८,२०,५००/- |
| | | | **एकूण अंदाजित खर्च** | **रु.१५,९६,४७०/-** |

**अटी :-**

१) सदरहू बाबींची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींची खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदर बाबींचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी यांनी) मान्य केलेल्या विनिर्देशानूसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III /उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खाजरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management ) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदर खरेदीवर होणारा खर्च “२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य (०१) (३७) राष्ट्रीय कुष्ठरोग नियंत्रण कार्यक्रम व रुग्णालये सांकेतांक २२१० ०९४१ पुरवठा व सामग्री” या लेखाशिर्षांअंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८) तसेच सदर बाबींच्या खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

११) दिनांक २६.०७.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनूसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुख यांची तसेच आरोग्य सेवा संचालनालयाची राहील.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०३१४२१५१२११७ हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2018.11.12 13:35:53 +05'30'

**( व. मुं. भरोसे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११) निवडनस्ती (आरोग्य-८)